१ जून,२०२० रोजी देय झालेल्या आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाच्या हप्त्याची (ग्रामीण) परतफेड करण्यासाठी रोख अनुदान (लेखाशीर्ष २२१५ ११७३)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एलआयसी-२०२०/प्र.क्र.२६/पापु-०४**
जी. टी. रुग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: १३ मे, २०२०

**वाचा -**

१) ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्र. एलआयसी-१०८७/सीआर-५४४/५९, दि. २ मे, १९८९
२) ग्रामविकास विकास विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. एलआयसी-१०८७/सीआर-५४४/५९, दि. १९ ऑक्टोबर,१९८९.
३) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र. ४४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल,२०१९

**प्रस्तावना -**

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता भारतीय आयुर्विमा महामंडळाकडून वर्ष २००१-२००२ अखेरपर्यंत जिल्हा परिषदांना मंजूर झालेल्या कर्जाच्या दिनांक ०१ जून,२०२० रोजी परतफेडीसाठी देय असलेल्या आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाच्या हप्त्यापोटी, मुद्दल व व्याज असे एकूण रक्कम रु ८,११,७७,४८६/- (रु. आठ कोटी, अकरा लाख, सत्याहत्तर हजार चारशे शहाऐंशी फक्त ) भारतीय आयुर्विमा महामंडळाकडे भरणा करण्याकरिता संदर्भात नमूद केलेल्या दिनांक ०२ मे,१९८९ रोजीच्या शासन निर्णयाप्रमाणे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वितरीत करावयाचे आहे.

०२. उपरोक्त प्रयोजनासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये रुपये रु.१२,७४,९३,००० ( बारा कोटी चौऱ्याहतर लाख त्र्यान्नव हजार फक्त ) इतकी तरतूद करण्यात आली आहे. त्यापैकी सदर तरतुदीतून दिनांक ०१.०६.२०२० रोजी देय झालेल्या मुद्यल रु. ५,५२,३५,८८०/- आणि रु. २,५९,४१,६०६/- व्याज अशी एकुण रक्कम ८,११,७७,४८६/- इतकी रक्कम विहित कालावधीत अदा

करण्याकरिता, सदर रक्कम महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता भारतीय महामंडळाकडून वर्ष २००१-२००२ अखेरपर्यंत जिल्हा परिषदांना मंजूर झालेल्या कर्जाच्या दिनांक ०१ जून,२०२० रोजी परतफेडीसाठी देय असलेल्या भारतीय आयुर्विमा महामंडळाच्या कर्जाचे हप्त्यापोटी, मुद्दल आणि व्याज अशी एकूण रक्कम रु. ८,११,७७,४८६/- (रु.आठ कोटी अकरा लाख सत्याहत्तर हजार च्यारशे शहाऐंशी फक्त ) इतकी रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळास परतफेड करण्याकरिता सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना मंजूर करीत आहे.

२. हे अनुदान कोषागारातून प्राप्त करण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या श्री. यशवंत बाबुराव पाटील,संचालक ( वित्त) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व श्री. म.बा.हजारी, सह सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांनी प्रतीस्वाक्षरीत केलेले देयक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांस सादर करावे. ही मंजूर रक्कम भारतीय आयुर्विमा महामंडळास भरणा करण्याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची आहे. सदर रक्कम इसीएस प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेले अनुदान एकूण रक्कम रु. ८,११,७७,४८६/- (रु.आठ कोटी अकरा लाख सत्याहत्तर हजार चारशे शहाऐंशी फक्त ) चा खर्च पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग- मागणी क्र. वाय-२-लेखाशीर्ष “२२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता -०१-पाणी पुरवठा-१०२- ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (०१) स्थानिक क्षेत्र-(०१) स्थानिक क्षेत्र- (०१) (०१) ग्रामीण पिण्याचे पाणी पुरवठा योजनांकरिता आयुर्विमा महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाच्या देय रकमांच्या परतफेडीबाबतचा खर्च भागविण्यासाठी जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ ११७३) ३१, सहाय्यक अनुदाने” (वेतनतर) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा आणि त्या खाली सन-२०२०-२०२१ वर्षाकरिता उपलब्ध अर्थसंकल्पीय योजनेतर तरतूदीतून हा खर्च भागवावा.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ९२/व्यय-३ दि. ११.५.२०२० अन्वये सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००५१३१६१८५७७४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2020.05.14 16:59:31 +05'30'

**(गणेश पवार)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टावर्स, ४ था मजला, मुंबई-४०००२१.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व ).
३) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, नवी मुंबई.
४) अधिक्षक अभियंता, (सीपीडीएम ) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , सिडको भवन, नवी मुंबई.
५) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर ( लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ).
६) निवासी लेखाधिकारी, मुंबई -४०००२१.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई.
९) कार्यकारी अभियंता ग्रा.पा.पु. जिल्हा परिषद ( सर्व ).
१०) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नाशिक/ पुणे/औरंगाबाद/ अमरावती / नागपूर.
११) वित्त विभाग, ( व्यय -३/ अर्थोपाय )मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्र. पापु-२०.
१३) निवडनस्ती ( का.क्र. पापु-०४ ),पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.